**पुणे महानगर प्रदेश क्षेत्रासाठी पाणी वाटप व पाणी वापर समिती स्थापन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: पीआरडी-३३१८/प्र.क्र.८५/नवि-७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०१ सप्टेंबर, २०१८.

**प्रस्तावना:-**

पुणे जिल्ह्यातील पाणी साठ्यांचा संपूर्णत: सर्वेक्षण करुन पुणे महानगर क्षेत्रासाठी पाण्याची आवश्यकता, ती कशाप्रकारे पुरविण्यात येईल तसेच, भविष्यात किती पाण्याची गरज भासणार आहे याबाबतचे ठोस धोरण ठरविण्यासाठी प्राधिकरणाने ठोस कार्यक्रम हाती घेणे, पाण्याची मर्यादित उपलब्धता व भविष्यात पाण्याची होणारी टंचाई लक्षात घेवून पाण्याचे नियोजन, व्यवस्थापन व नियंत्रण बाबतचे पुढील दीर्घकालीन धोरण ठरवून तसा आराखडा तयार करणे, तसेच पाण्याच्या पुर्नवापराबाबतही विचार करुन तसा आराखडा तयार करण्यास प्राधिकरणाच्या चौथ्या सभेतील ठराव क्रमांक ६ अन्वये प्राधिकरणाने मान्यता दिली आहे. पुणे प्राधिकरण क्षेत्रातील पाण्याचा वापर व पाण्याचे वाटप करण्यासाठी मा. प्रधान सचिव, नगर विकास यांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापनेस मंजुरी देऊन अशी समिती स्थापन करण्याबाबत दिनांक ०६.०६.२०१८ च्या पत्रान्वये पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने विनंती केली आहे.

त्यानुषंगाने पुणे महानगर प्रदेश क्षेत्रासाठी मिळणाऱ्या पाण्याची निकड विचारात घेऊन पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने क्षेत्रातील पाणी वाटप व पाणी वापर समिती स्थापन करण्याबाबत शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

पुणे महानगर प्रदेश क्षेत्रातील पाणी साठ्याचा वाटप व वापर समिती स्थापन करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर समितीत खालीलप्रमाणे सदस्य राहतील:-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे पदनाम | शेरा |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव, नगर विकास विभाग (नवि-१), मंत्रालय, मुंबई-३२ | अध्यक्ष |
| २ | प्रधान सचिव, नगर विकास विभाग (नवि-२), मंत्रालय, मुंबई-३२ | सदस्य |
| ३ | प्रधान सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२. | सदस्य |
| ४ | आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे | सदस्य |
| ५ | आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका, पिंपरी | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ६ | महानगर आयुक्त, पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, पुणे | सदस्य सचिव |
| ७ | कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्ण खोरे विकास महामंडळ, पुणे | सदस्य |

३. ही समिती पुणे महानगर प्रदेश क्षेत्रातील पाणी साठ्यांचा व पाण्याच्या वापराचा अभ्यास करुन पाणी वाटपाबाबत जलसंपदा विभागास शिफारस करेल.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१८०९०११२१२०८९३२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Vishnu Shripati Patil

Digitally signed by Vishnu Shripati Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=21ebe4508a75a767041512feeaa6b8f2d5bc8caf857fe02cd29ce4bbb772da09, serialNumber=f8a0fc598f692587efafe9bd62df9e449fdf81c803c27adf1782c97c76ebcba5, cn=Vishnu Shripati Patil
Date: 2018.09.01 16:08:00 +05'30'

**( वि. श्री. पाटील )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
३) मा. राज्यमंत्री, नगर विकास विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) प्रधान सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे
८) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका, पिंपरी, पुणे.
९) महानगर आयुक्त, पुणे महागनर प्रदेश विकास प्राधिकरण, पुणे.
१०) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्ण खोरे विकास महामंडळ, पुणे.
११) निवड नस्ती, नगर विकास विभाग/नवि-७.